संस्कृत
साहित्य
सरिता
७

भवभूति-कृत

# उत्तररामचरित

कथासार
अमरेन्द्र

वोरा ॲन्ड कंपनी, पब्लिशर्स (प्रायव्हेट) लि०

## संस्कृत-साहित्य-सरिता

विशाल महासागराला असंख्य नद्या येऊन मिळत असतात. अशा अगणित नद्यांनींच अमर्याद सागर बनलेला असतो. संस्कृत साहित्याचा महासागरहि असाच अनेक सरितांनीं समृद्ध झालेला आहे. ‘ संस्कृत-साहित्य-सरिता ’ असें नांव दिलेल्या या वाङ्‌मयमालेंतून आपली आदिभाषा जी संस्कृत तिच्यांतील उत्तम उत्तम वाङ्‌मयाचा कथारूपानें थोडक्यांत परिचय करून देण्याचें आम्ही योजिलें आहे. संस्कृत वाचणारे थोडे आणि समजणारे तर त्याहून कमी. तेव्हां आजच्या सर्वसामान्य माणसाला, लिहितां-वाचतां येऊं लागलेल्या नवशिक्षितालाहि या संस्कृत-वाणीचा आस्वाद कसा घेतां येणार ? परंतु त्यांना तो मिळणें तर आवश्यक आहे; कारण संस्कृत भाषेंतील वाङ्‌मय हा आपला फार थोर वारसा आहे. तो गमावणें म्हणजे सर्वस्वच गमावून बसणें. यासाठींच संस्कृत भाषेंतील थोर, प्रसिद्ध अशा वाङ्‌मयकृतींचें, नाटकांचें आणि काव्यांचें, कथासार आम्ही वाचकांपुढें सादर करीत आहोंत.

आम्ही असें समजतों कीं, देवभाषेंतील या वाङ्‌मयीन कलाकृतींचा परिचय करून देण्याची आमची ही योजना एक चांगली योजना आहे—एक सत्संकल्प आहे. आणि असे सत्संकल्प उत्तम रीतीनें तडीला नेण्याचें काम जनताजनार्दनाचेंच आहे. तें तसें घडो, हीच इच्छा.

—प्रकाशक

## परिचय

भवभूतीचा काळ आठव्या शतकांतला मानला जातो. 'महावीरचरित', 'मालतीमाधव' आणि 'उत्तररामचरित' हीं तीन नाटकें भवभूतीचीं म्हणून प्रसिद्ध आहेत. या शिवायहि या महाकवीनें इतर कांहीं ग्रंथरचना केली असावी अशी शक्यता आहे; परंतु त्याबद्दल कांहींच निश्चित माहिती उपलब्ध झालेली नाहीं.

वाल्मीकि रामायणांत रामानें अयोध्येला परत आल्यानंतर लोकापवादामुळें सीतेचा त्याग केला व उभयतांचा तो विरह कायमचाच ठरला असा इतिहास आहे. परंतु भवभूतीच्या कविमनाला रामायणाचा मुळांत शोकान्त असलेला शेवट रुचला नाहीं; म्हणून त्यानें हें नाटक लिहून रामसीता यांचें पुन्हां मीलन झाल्याचें दाखविलें आहे. आणि वाल्मीकींच्या रामायणांत नसला तरी दुसऱ्या कांहीं पुराणपरंपरेप्रमाणें याहि संभवाला आधार आहे असें कांहीं विद्वान म्हणतात.

'उत्तररामचरित' हें मुख्यतः मानसशास्त्रीय विश्लेषण आहे. प्रत्यक्ष नाटकांत घटनांचें कथानक तसें फार थोडें दिसेल; परंतु रामायणांतील व्यक्तींचें मानसिक चित्रण यांत अत्यंत बहारदार उमटलेलें आहे.

— लेखक

# उत्तररामचरित

श्रीरामानें मानवशत्रु रावणाचा वध केला. राक्षसांच्या दुष्ट प्रवृत्तीला आळा घालून बिभीषणासारखा सात्त्विक पुरुष लंकेच्या राज्यावर बसविला. आणि पित्याच्या वचनाकरितां पत्करलेला वनवास संपवून तो अयोध्येला परत आला. अयोध्येंत त्याच्या राज्याभिषेकाचा केवढा समारंभ झाला. सर्वत्र आनंद व उत्साह यांना भरती आली. अयोध्या नगरी गजबजून गेली.

राज्यारोहणाचा समारंभ पार पडला. त्यानंतर कांहीं दिवसांत समारंभाचें सूप वाजलें. दूर दूर ठिकाणाहून आलेले मोठमोठे पाहुणे आपआपल्या ठिकाणीं परत गेले. त्यामुळें साहजिकच अयोध्येंत सुनेंसुनें वाटूं लागलें. जनक राजाहि मिथिलेला परत गेला. त्यामुळें सीता अगदीं खिन्न होऊन गेली. किती झालें तरी ते वडीलच तिचे.सीता उदास होऊन बसली आहे, असें रामाला कळलें, तेव्हां तो तिचें समाधान करण्यासाठीं अंत:पुरांत गेला. येथूनच या नाटकाला प्रारंभ झाला आहे.

१ ***

रामाच्या राज्यारोहणानंतर जनक मिथिलेला परत गेला. वडील निघून गेल्यामुळें सीता उदास झाली. राम तिच्याजवळ येऊन बसला. तो तिला समजावीत होता. "वडील माणसें आपापल्या ठिकाणीं गेलीं तीं का सुखानें गेलीं? त्यांना त्यांचीं त्यांचीं कामें आहेतच. मग त्याबद्दल वाईट वाटून घेऊन कसें चालेल?"

सीतेलाहि हें कळत होतें. परंतु आवडत्या माणसांचें दूर जाणें कोणालाहि दुःखदायकच असतें, असें ती म्हणाली.

सीतारामांचें हें बोलणें चाललें आहे इतक्यांत कंचुकीनें येऊन सांगितलें कीं, ऋष्यशृंग मुनींच्या आश्रमांतून अष्टावक्र कांहीं निरोप घेऊन आले आहेत. ऋष्यशृंग म्हणजे रामाचा मेहुणा. रामाची बहीण शान्ता हिचा पति. ऋष्यशृंगाच्या आश्रमांत यावेळीं यज्ञ चाललेला होता आणि वसिष्ठ ऋषि त्या यज्ञांत गुंतलेले होते. वसिष्ठांची पत्नी अरुंधतीहि तेथेंच होती.

अष्टावक्राचें स्वागत करून रामानें आपल्या बहिणीची व मेव्हण्याची खुशाली विचारली. नंतर अष्टावक्रानें गुरु वसिष्ठांनीं सीतेला "वीरमाता हो" असा आशीर्वाद दिला असल्याचें सांगितलें. तसेंच अरुंधती, राजमाता आणि शान्ता यांनीं रामासाठीं मुद्दाम निरोप पाठविला होता कीं, सीतेचे सर्व डोहाळे लगोलग पुरवीत जा. वास्तविक राम ते अगोदरपासूनच पुरवीत होता.

वसिष्ठ गुरूंची आणखी कांहीं आज्ञा आहे का म्हणून रामानें पुन्हा विचारलें. तेव्हां अष्टावक्रानें सांगितलें, " होय, गुरु वसिष्ठांनीं कळविलें आहे कीं, आम्ही सध्यां यज्ञांत गुंतल्यामुळें तुझ्याजवळ नाहींत. तुझें वय लहान आहे. तूं राज्याची जोखीम नवीनच शिरावर घेतलेली आहेस. तेव्हां प्रजाजनांना संतुष्ट ठेवण्याच्या बाबतींत दक्ष राहा. त्यानेंच तुझें कल्याण होईल. प्रजेचा संतोष हेंच राजेलोकांचें धन आहे."

रामानें वसिष्ठांची ही आज्ञा शिरसावंद्य मानून म्हटलें, " प्रेम, दया, सुख फार काय पण लोकांच्या संतोषासाठीं प्रत्यक्ष जानकीचाहि त्याग करावा लागला तरी मला वाईट वाटणार नाहीं."

सीताहि रामाच्या या म्हणण्याला अनुमोदन देत म्हणाली, " आणि म्हणूनच तर आर्यपुत्र रघुकुलधुरंधर शोभतात ! "

अष्टावक्रानें आपलें निरोप सांगण्याचें काम होतांच रामाचा निरोप घेतला. तो जातो तोंच लक्ष्मण तेथें आला. त्यानें रामाला सांगितलें कीं, तुमच्या सूचनेप्रमाणें चित्रकारानें पलीकडच्या दालनांतील भिंतीवर तुमच्या चरित्रांतील चित्रें काढलीं आहेत, तीं पाहावयास चला. सीतेचा उदासपणा घालवावयास तें एक चांगलें साधन होतें, म्हणून रामाला ती कल्पना पसंत पडली. पण त्यानें सहज चवकशी केली कीं, चित्रें कोठवर काढून झालीं आहेत ? सीता लंकेंतून परत आल्यावर तिनें अग्निदिव्य करून स्वतःची शुद्धता पटविली तेथपर्यंत चित्रें तयार

झालीं होतीं. लक्ष्मणानें तसें चटकन् सांगून टाकलें. परंतु तो प्रसंग आठवतांच रामाचें मन अस्वस्थ होऊन गेलें. तो म्हणाला, " छे: छे: ! हिला आणखी कशानें शुद्ध करणार ! ही तर जन्मजात शुद्धच. तीर्थोदक आणि अग्नी यांना कोठें दुसऱ्यांनीं शुद्ध करावयाचें असतें काय ?" आणि पूर्वीच्या त्या प्रसंगाची दु:खकारक आठवण होऊन रामानें सीतेची मन:पूर्वक क्षमा मागितली. तो म्हणाला, " लोकांना संतुष्ट राखणें मोठें कठीण काम आहे. त्यावेळीं तुला निष्कारणच दुरुत्तरें ऐकून घ्यावीं लागलीं, पण तीं अगदीं अयोग्य होतीं."

राम व सीता यांना लक्ष्मण ती चित्रें दाखवूं लागला. जृंभकास्त्रांचें चित्र पाहून सीतेनें हें काय म्हणून विचारलें. लक्ष्मणानें जृंभकास्त्रांची माहिती देऊन तीं विश्वामित्रांनीं रामाला कशीं दिलीं तेंहि सांगितलें. रामाच्या सांगण्यावरून सीतेनें चित्रांतील त्या अस्त्रदेवतांना नमस्कार केला. तेव्हां राम म्हणाला, " देवी, पुढें हीं अस्त्रें तुझ्या पुत्रांना प्राप्त होतील."

त्यानंतर क्रमानें मिथिलेंतील विवाह समारंभ, परशु-रामाचें आगमन इत्यादि अनेक प्रसंगांचीं चित्रें पाहात पाहात तीं माल्यवान पर्वताच्या चित्रापर्यंत येऊन ठेपलीं. परंतु तेवढ्या श्रमानें, गरोदर असलेली सीता अगदीं थकून

गेली. म्हणून चित्रें दाखविण्याचें काम लक्ष्मणानें तेवढ्या-वरच थांबवलें. परंतु तोंवर पाहिलेल्या चित्रांमुळें सीतेच्या मनांत आलें कीं, पुन्हां एकदां त्या प्रसन्न वनराजींत जाऊन विहार करावा आणि भागीरथींत मनसोक्त स्नान करावें. मोठ्या संकोचानें तिनें आपले हे डोहाळे रामापाशीं बोलून दाखविले. रामानें लगेच लक्ष्मणाला सांगितलें कीं, 'रस्त्यावरच्या खांचखळग्यांनीं त्रास न होईल असा रथ ताबडतोब तयार करून आण.' सीतेचे हे डोहाळे पुरविण्यासाठीं स्वतःच तिला भागीरथीच्या तीरीं घेऊन जाण्याचें रामानें ठरविलें होतें.—परंतु दैवाच्या मनांत कांहीं निराळेंच होतें!

दमलेली सीता रामाच्या हातावर डोकें ठेवून शांत झोंपीं गेली. राम तिच्यावरील प्रेमाबद्दलचाच विचार करीत बसला होता. इतक्यांत त्याचा गुप्त हेर दुर्मुख तेथें आला. त्यानें इतर सर्व कांहीं ठीक असल्याचें म्हटलें, परंतु शेवटीं रामाला हळूच एक नाजुक गोष्ट सांगितली. सीता रावणाच्या राजधानींत म्हणजे लंकेमध्यें पुष्कळ दिवस राहिल्यामुळें तिच्या शुद्धतेबद्दल लोक शंका काढीत आहेत, ही ती गोष्ट होती. ती ऐकून रामाला पराकाष्ठेचें दुःख झालें. "दुसऱ्याच्या घरीं राहिल्यामुळें सीतेला लागलेला कलंक दुर्दैवानें कुत्र्याच्या विषाप्रमाणें सर्वत्र फैलावत आहे," असे उद्गार रामाच्या तोंडून निघाले. आतां

यावर उपाय काय करावा, याचा तो विचार करूं लागला. थोड्या वेळापूर्वींच त्यानें म्हटलें होतें कीं, 'लोकांच्या संतोषासाठीं सीतेलाहि टाकून द्यावी लागली तरी आपल्याला वाईट वाटणार नाहीं.' दुर्दैव त्याच्या त्या वचनाची परीक्षाच या वेळीं घेत होतें. परंतु राम कठोर मन करून त्याहि परीक्षेंत उतरला. त्यानें लक्ष्मणाला गुप्तपणें आज्ञा करून सीतेची रवानगी भागीरथीच्या कांठील अरण्यांत केली. लक्ष्मण मोठ्या दुःखानें तिला एकटीलाच तेथें सोडून परत आला.

याच वेळीं यमुना नदीच्या तीरावर लवण राक्षसानें धमाल उडवून दिली होती. तेव्हां त्याच्यापासून आपलें रक्षण करण्याची विनंती करण्यासाठीं तेथील ऋषि रामाकडे आले होते. रामाला तें समजतांच त्यानें लवणासुराचा नाश करण्यासाठीं शत्रुघ्नाला तिकडे पाठवून दिलें.

२ ...

या गोष्टीला बारा वर्षें उलटून गेलीं. राम अयोध्येंत राज्यकारभार चालवीत होता. सीता वनांत पतिविरहाच्या दुःखानें झुरत कसेंबसें आयुष्य कंठीत होती.

एक दिवस महर्षि वाल्मीकींच्या आश्रमांतील आत्रेयी नांवाची एक तापसी दण्डकारण्यांतून चालली होती.

अगस्ती ऋषींकडे वेदान्तविद्या शिकण्यासाठीं म्हणून ती निघाली होती. तेथील वनदेवतेनें त्या प्रवासी तापसीचें स्वागत केलें. आत्रेयी ब्रह्मवेत्त्या वाल्मीकींचा आश्रम सोडून वेदान्त शिकण्यासाठीं इतक्या दूरवर दण्डकारण्यांत अगस्तींपाशीं निघाली आहे हें ऐकून मात्र तिला नवल वाटलें. तिनें आत्रेयीला तसें स्पष्ट विचारलेंहि. त्यावर आत्रेयीनें त्याचें एक विलक्षणच कारण सांगितलें :

कोणा एका देवतेनें वाल्मीकि ऋषींपाशीं कुश व लव नांवाचीं दोन अगदीं लहान बालकें आणून दिलीं असून त्यांनीं आपल्या तरतरीतपणामुळें सगळ्यांना वेड लावलें आहे. नुकतींच अंगावरील पिणें सुटलेलीं हीं मुलें मोठीं हुषार व तेजस्वी आहेत. त्यांना जन्मापासूनच जृंभकास्त्रें व त्यांसंबंधींचे गुप्त मंत्र अवगत झालेले आहेत. वाल्मीकींनीं या मुलांचें मोठ्या प्रेमानें संगोपन केलें असून त्यांच्या आतां मुंजीहि झाल्या आहेत. त्यांची ग्रहणशक्ति मोठी तीव्र असून त्यांच्या बरोबरीनें विद्या ग्रहण करणें आमच्या-सारख्यांना जमत नाहीं; आणि हीच माझी मुख्य अडचण वाल्मीकींच्या आश्रमांत राहाण्याबाबतींत झाली. आणखीहि दुसरीहि एक अडचण आहेच. वाल्मीकि एकदा तमसा नदीच्या तीरावर गेले असतांना त्यांनीं तेथें एका पारध्यानें क्रौंच पक्ष्याच्या जोडप्यांतील एकाला ठार मारलेलें पाहिलें. त्यामुळें कळवळून जाऊन त्यांच्या मुखांतून श्लोकवाणी

निघाली. ब्रह्मदेवानें वाल्मीकींना आशीर्वाद देऊन सांगितलें कीं या वाणीनेंच तूं रामचरित्र वर्णन कर. त्याप्रमाणें वाल्मीकींनीं रामायणाची रचना केली आहे; आणि तिचाच प्रचार सध्यां होत आहे.

ही हकीकत सांगून होईपर्यंत आत्रेयीचें विश्रांति घेणेंहि पुरें झालें होतें. तेव्हां तिनें अगस्तींच्या आश्रमाचा रस्ता त्या वनदेवतेला विचारला.

" अशा इकडून पंचवटीवरून गोदावरीच्या तीरातीरानें जा म्हणजे थेट अगस्तींच्या आश्रमांत जाऊन पोहोंचाल." वनदेवतेनें सांगितलें.

" म्हणजे ही पंचवटी कीं काय ? मग ही नदी गोदावरी आणि हा पर्वत प्रस्रवण तर नव्हे ? आणि आपण जन-स्थानाच्या वनदेवता वासंती ?" आत्रेयीच्या डोळ्यांतून झरझर अश्रू वाहायला लागले. आत्रेयीचें अनुमान बरोबर होतें. वासंतीनें आपली ओळख देतांच आत्रेयीला पूर्वींच्या आठवणींनीं दुःखाचा उमाळा आला आणि ती शोक करूं लागली. "हाय, सीते! आज तूं प्रत्यक्ष जरी नाहींशी झाली असलीस तरी मनापुढें मात्र तुझी मूर्ति साक्षात उभी राहाते !" आत्रेयीचें तें बोलणें ऐकून वासंती चपापली. तिला सीतेविषयींचा अलीकडील वृत्तान्त कांहींच माहीत नव्हता. आत्रेयीनें सीतेवर लोकापवाद कसा आला आणि

रामानें तेवढ्यावरून तिला कसें टाकून दिलें, तिला लक्ष्मणानें अरण्यांत आणून कसें सोडलें इत्यादि सर्व हकीकत सांगितली. तें ऐकून वासंतीला फारच वाईट वाटलें. तिला रामाचें हें कृत्य मुळींच पसंत पडलें नाहीं.

आत्रेयीकडून तिला आणखीहि बऱ्याच गोष्टी समजल्या. रामानें सीतेला टाकून दिली त्यावेळीं ऋष्यशृंगाच्या आश्रमांत एक बारा वर्षांचें यज्ञसत्र चालू झालें होतें. त्यासाठीं राजमाता, वसिष्ठ, अरुंधति इत्यादि वडील मंडळी तिकडेच गेलेली होती. सीतात्यागाची हकीकत ऐकून त्या सर्व मंडळींनीं राजधानींत परत न जातां वाल्मीकींच्या आश्रमांत जाऊन राहाण्याचें ठरविलें. सध्या रामानें अश्वमेध यज्ञ आरंभिला असून धर्मपत्नी म्हणून सीतेची सोन्याची मूर्ति करून आपल्याजवळ बसविली आहे. अश्वमेधाचा घोडा सोडला असून त्याच्या रक्षणासाठीं लक्ष्मणाचा मुलगा चंद्रकेतू याला पाठविलें आहे.

अलीकडेच अयोध्येंत एका ब्राह्मणाचा मुलगा अकालीं मरण पावल्यामुळें त्या ब्राह्मणानें त्याचें प्रेत रामाच्या राजद्वारीं आणून टाकलें. हा अनर्थ शंबूक नांवाचा कोणीएक शूद्र पृथ्वीवर तप करूं लागल्यानें झाला आहे अशी आकाशवाणी झाली. शूद्रानें तप करणें हें धर्माच्या दृष्टीनें गुन्हा असल्यामुळें त्याला शिक्षा करणें अवश्य होतें. म्हणून स्वतः

रामच हातांत तलवार घेऊन त्या तप करणाऱ्या शूद्राच्या शोधार्थ विमानांतून निघाले आहेत.

हें सर्व आत्रेयीनें सांगतांच वासंतीला एक तऱ्हेनें बरें वाटलें. कारण तो शूद्र शंबूक तेथें जनस्थानांतच तप करीत राहिलेला होता. अर्थात् रामाला त्याचा शोध करीत करीत जनस्थानांतच यावें लागलें असतें हें उघड होतें.

वासंतीच्या कल्पनेप्रमाणें थोडयाच वेळांत राम तेथें येऊन पोहोंचला. त्यानें शंबुकाचा शिरच्छेद करतांच त्याच्या शरीरांतून एक दिव्य पुरुष निघाला व तो रामाला म्हणाला कीं, " तूं शिरच्छेद केलेलाच मी शंबूक. ब्राह्मणाचा मुलगा आतां जिवंत झाला आहे आणि मलाहि या दिव्य देहाचें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे. सज्जनांच्या हातून आलेलें मरणहि उद्धार करणारेंच ठरतें ! "

त्या दिव्यदेहधारी पुरुषाशीं बोलत असतांनाच रामाला कळलें कीं, आपण आलों आहोंत हें दण्डकारण्य असून जन-स्थानांतील पंचवटी जवळच आहे. तें समजल्यावर मात्र एखादें जहाल विष अंगांत बराच काळपर्यंत भिनून राहावें व नंतर एकाएकीं तें शरीरांत सगळीकडे पसरूं लागावें तसें रामाला झालें. त्याचें सीतेबद्दलचें दुःख बर्फ वितळल्या-प्रमाणें एकाएकीं अंतःकरणांतून फुटून वाहूं लागलें. पूर्वी वनवासांत असतांना तिच्यासह जे दिवस येथें घालविलेले

होते त्यांच्या आठवणी काढून तो अतिशय शोक करूं लागला. तथापि पंचवटींत जाण्यानें शोक वाढेल म्हणून तो तिकडे जाण्यास तयार नव्हता. परंतु शंबुकाच्या आग्रहामुळें त्यानें पंचवटीजवळ असलेल्या अगस्ति ऋषींचें दर्शन घेण्याचें मात्र कबूल केलें.

२ ***

शंबुकाला शिक्षा करण्याच्या निमित्तानें राम जनस्थानांत येत असल्याचें कळल्यामुळें तेथील तमसा,गोदावरी इत्यादि नद्यांची मोठी धांदल उडाली. अगस्तींच्या आश्रमांतहि ती बातमी पोहोंचून त्यांची पत्नी लोपामुद्रा हिचीहि तशीच स्थिति झाली. तिनें मुरला नांवाच्या नदीच्या हातीं गोदावरीला निरोप पाठविला कीं, राम येथें आल्यावर त्याला सीताविरहाचें दुःख अनावर होईल. त्या वेळीं त्याला मूर्च्छाहि येण्याचा संभव आहे. तेव्हां तुझ्या शीतल पाण्याचा उपयोग करून त्याला सावध कर आणि कांहीं अनुचित घडूं नये म्हणून तूं त्याचें सांत्वनहि कर. मुरला हा निरोप घेऊन चालली असतां तमसा नदी तिला वाटेंत भेटली. अर्थातच दोघींनीं एकमेकींची चौकशी केली. लोपामुद्रेचा तो निरोप ऐकून तमसा म्हणाली, "लोपामुद्रेनें रामावरील प्रेमामुळें अशी काळजी घ्यावी हें योग्यच आहे. परंतु रामाची खरीखुरी संजीवनी जी सीता तीच

आज जातीनें येथें उपस्थित आहे." आणि मग तमसेनें सीता तेथें कशी आली त्याची हकीकत मुरलेला सांगितली.

लक्ष्मण सीतेला वाल्मीकि ऋषींच्या आश्रमाजवळील अरण्यांत सोडून निघून गेला. सीतेचे दिवस अगदीं भरत आले असल्यामुळें तिला अनावर वेदना होऊं लागल्या. पतीनें टाकून दिल्याचें दुःखहि भयंकर होतें. तें सर्व तिला सहन न झाल्यामुळें तिनें बेभान होऊन समोरील भागीरथी नदीच्या प्रवाहांत उडी घेतली. तेथेंच ती प्रसूत होऊन तिला दोन मुलगे झाले. भागीरथी आणि पृथ्वी या दोघींनीं कनवाळू होऊन तिला धीर दिला आणि त्या तिला पाताळांत घेऊन गेल्या. तीं मुलें तान्हीं होतीं तोंपर्यंत आपल्या आई-जवळच होतीं. पुढें अंगावर पिण्याचें सुटल्यावर त्यांना भागीरथीनें वाल्मीकींच्या आश्रमांत आणून त्यांच्याच हवालीं केलें. त्या गोष्टीला आतां बारा वर्षें झालीं असून त्याच दिवशीं त्या दोन मुलांच्या-कुशलवांच्या-बाराव्या वाढदिवसानिमित्त त्यांना मंगल गांठ बांधावयाची होती. त्यानिमित्त भागीरथीनें सीतेला सूर्यनारायणाची पूजा करावयास सांगितलें होतें; आणि तमसा ही पूर्वीपासूनच सीतेच्या प्रेमांत असल्यामुळें तिला सीतेबरोबर राहावयाला सांगितलें होतें. आतां तमसा त्या कामगिरीवरच निघाली होती.

वास्तविक लोपामुद्रेप्रमाणेंच भागीरथीलाहि शरयूनें शंबूक प्रकरणाची हकीकत सांगितली होती व त्यासाठीं राम जनस्थानांत येण्याची शक्यता बोलून दाखविली होती. सीतेला या वेळीं तेथें आणविण्यांत भागीरथीचा हेतुहि लोपामुद्रेप्रमाणेंच होता. सीतेला मात्र यांतलें कांहीं माहीत नव्हतें. आणि भागीरथीनें तिला असा वरहि दिला होता कीं, 'तूं पृथ्वीवर हिंडत असतांना कोणाला–प्रत्यक्ष देवतांनासुद्धां–दिसणार नाहींस.' रामाला तर यांतलें कांहींच माहीत असण्याचें कारण नव्हतें.

मूर्तिमंत विरहव्यथाच अशी सीता गोदावरीच्या प्रवाहांतून वर आली. तेथें तमसा तिला भेटली. तेवढ्यांत रामाचें पुष्पक विमानहि तेथें येऊन उतरलें. रामाला जनस्थानांतील तीं पूर्वपरिचित स्थळें पाहून सीतेची आठवण तीव्रपणानें झाली.त्याच्या विरहदु:खाला पुन्हां भरती आली. त्याला भडभडून आलें व दु:खावेगानें तो बेशुद्ध पडला. तेव्हां तमसेच्या सांगण्यावरून सीतेनें त्याला आपल्या हाताचा स्पर्श करतांच तो भानावर आला. त्याला नक्की वाटलें कीं हा स्पर्श प्रत्यक्ष सीतेचाच आहे; परंतु सीतेला अदृश्यपणाचा वर मिळाला असल्यामुळें रामाला मात्र ती दिसली नाहीं. त्यामुळें तर तो अधिकच व्याकुळ झाला.

थोड्या वेळांत तेथील वनदेवता वासंती रामाला येऊन भेटली. पूर्वीं वनवासांत असतांना रामाच्या ती चांगलीच

परिचयाची झालेली होती. रामानें सीतेला टाकून दिल्याबद्दल तिनें रामाची खूप निर्भर्त्सना केली. हें असें दुष्ट कृत्य तूं कां केलेंस, म्हणून तिनें रामाला विचारलें तेव्हां रामानें उत्तर दिलें कीं, "लोकांच्या समाधानासाठीं." त्यावर वासंती म्हणाली कीं, "तूं म्हणत असशील कीं तुला अब्रूची चाड आहे; पण आतां तुझी बेअब्रू व्हावयाची ती आणखी काय राहिली आहे!"

वासंतीच्या या टोचून बोलण्यामुळें रामाला अधिकच दुःख झालें आणि त्याला दुःखी झालेलें पाहून सीता वासंतीलाच बोल लावूं लागली. राम त्या दुःखानें पुन्हा मूर्च्छित होऊन पडला तेव्हां सीतेनें पुढें होऊन त्याच्या हृदयाला व कपाळाला स्पर्श केला. त्यामुळें राम शुद्धीवर येऊन त्यानें सीतेचा हात पकडला व त्याला सीता भेटली असें वाटून फार बरें वाटलें. परंतु सीतेनें चटकन आपला हात सोडवून घेतला व ती दूर झाली. राम वासंतीला म्हणाला कीं, सीतेनें मला स्पर्श केला, ती येथेंच आहे. पण सीता अदृश्य असल्यामुळें वासंतीला यांतलें कांहींच समजत नव्हतें. तिनें रामाची समजूत घातली. रामानेंहि अश्वमेध यज्ञाची आठवण करून अयोध्येला लवकर परत जावयाला हवें म्हणून म्हटलें. सीतेला भीति वाटत होती कीं अश्वमेधासाठीं पत्नीची आवश्यकता असल्यामुळें रामानें दुसरें लग्न केलें असेल. परंतु राम वासंतीला जेव्हां म्हणाला कीं,

"यज्ञासाठीं करून बसवलेली सीतेची सोन्याची मूर्ति पाहून तरी मला माझें मन रिझवूं दे," तेव्हां तिचा गैरसमज दूर झाला. लोकापवादासाठीं रामानें आपल्याला टाकलें असलें तरी अजूनहि त्याच्या अंतःकरणांत आपल्यावरील प्रेम कायम आहे हें तिला कळून चुकलें व त्यामुळें मोठें समाधानहि वाटलें. कांहीं वेळानंतर राम अयोध्येला निघून गेला आणि सीता तमसेबरोबर परतली.

४ ...

वाल्मीकीच्या आश्रमांत रामाच्या नात्यांतलीं बरींच वृद्ध माणसें गोळा झालीं होतीं. वसिष्ठ ऋषि आपली पत्नी अरुंधती आणि अयोध्येच्या राजमाता यांना घेऊन आले. त्यानंतर जनकहि येऊन पोहोंचला. वसिष्ठांच्या सांगण्यावरून राजमाता कौसल्या जनकाच्या भेटीसाठीं त्याच्याकडे आली. जनक आपल्या मुलीवर-सीतेवर कोसळलेल्या भयंकर प्रसंगामुळें शोकानें अगदीं वेडा होऊन गेला होता. कौसल्या त्याच्या भेटीला आल्यानें तर उभयतां सीतेच्या आठवणी काढून अधिकच दुःख करूं लागलीं. कौसल्या तर दुःखानें मूर्च्छित झाली. तेव्हां जनकानें आपल्या कमंडलूंतील पाणी शिंपडून तिला सावध केलें. अरुंधतीहि तिचें सांत्वन करीत म्हणाली, "धीर सोडूं नकोस. ऋष्यशृंगाश्रमांत असतांना कुलगुरूंनीं (वसिष्ठांनीं)

सांगितलें होतें तें विसरलीस वाटतें! 'शेवट गोड होईल,' म्हणून ते म्हणाले आहेत."

त्यांचें हें बोलणें चाललें आहे तोंच आश्रमांतलीं मुलें आनंदानें खेळत बागडत येत असलेलीं या मंडळींच्या दृष्टीला पडलीं. त्यांतला एक मुलगा क्षत्रियकुमार असावा अशी शंका कौसल्येला आली. त्याचा तोंडावळा रामासारखा आहे असें तिला व जनकालाहि वाटलें. म्हणून त्यांनीं त्या कुमाराला आपल्याजवळ बोलावून घेतलें. वास्तविक हा सीतेचा मुलगा लव होता परंतु तें त्यांपैकीं फक्त अरुंधतीलाच माहीत होतें. भागीरथीनें ती एक गुप्त गोष्ट म्हणून तिला सांगितलेली होती त्यामुळें अरुंधतीला तीं उघड करतां येत नव्हती. लवाकडूनच त्या मंडळींना कळलें कीं त्याला कुश नांवाचा मोठा भाऊ असून तो नाटयाचार्य भरतांच्या आश्रमांत गेला आहे. महर्षि वाल्मीकींनीं सीतात्यागापर्यंतचें रामायण काव्यात्मक लिहिलें परंतु पुढील कथाभागावर एक नाटक रचून त्यांनीं तें भरतमुनींकडे पाहण्यासाठीं पाठविलें होतें. त्या मंडळींबरोबरच त्याचें रक्षण करण्यासाठीं कुश तिकडे गेला होता. ही हकीकत ऐकून जनक व कौसल्या यांना अधिकच उत्सुकता वाटूं लागली ; कारण त्यांचें मन त्यांना सांगत होतें कीं रामाच्या तोंडावळयाचा हा मुलगा सीतेचाच मुलगा असला पाहिजे. म्हणून ती वृद्ध मंडळी हें रहस्य

विचारण्यासाठीं स्वतःच वाल्मीकींकडे जाण्यास निघाली. लवाचें आणि त्याच्याबरोबरच्या मुलांचें लक्ष मात्र एका निराळ्याच गोष्टीनें वेधून घेतलें.

रामाच्या अश्वमेध यज्ञाचा घोडा हिंडत हिंडत त्यावेळीं वाल्मीकींच्या आश्रमापाशीं आला होता. लक्ष्मणाचा मुलगा चंद्रकेतु या यज्ञीय घोड्याच्या रक्षणासाठीं त्याच्याबरोबर होता. त्या घोड्याच्या आजूबाजूला सशस्त्र सैनिक चाल- लेले होते. आश्रमांतल्या मुलांनीं हा सर्व प्रकार लवाला येऊन सांगितला. लवानें या यज्ञासंबंधींचें शास्त्र वाचलेलें असल्यामुळें तो घोडा स्वतः पाहातांच त्याच्या लक्षांत येऊन चुकलें कीं हा अश्वमेधाचा घोडा आहे. इतक्यांत घोड्याबरोबरच्या सैनिकांनीं घोषणाहि केली कीं, हा घोडा म्हणजे रामाच्या अजिंक्यपणाची दवंडीच आहे ! अश्वमेध म्हणजे इतर राजांना व क्षत्रियांना आव्हान हें लवाला माहीत होतें. त्यांत ही उघड घोषणा ऐकून तो एकदम खवळला व त्यानें आपलें धनुष्य सज्ज केलें. बरोबरच्या मुलांना त्यानें सांगितलें कीं, ' जा या घोड्याला ओढून घेऊन आणि आश्रमांतील हरिणांच्या संगतींत द्या ठेऊन. '

५ ...

कोणीतरी घोडा अडविला तेव्हां अर्थातच हा काय

प्रकार आहे हें पाहाण्यासाठीं स्वत: चंद्रकेतूलाच त्या ठिकाणीं यावें लागलें. परंतु तोंवर लवानें आपल्या भयंकर बाणवृष्टीनें त्याच्या सैन्याची पार त्रेधातिरपिट उडवून दिली होती. चंद्रकेतूचें सैन्य मागें फिरूं लागलें होतें. तोंच समोर येऊन रणांगणांत उभ्या असलेल्या लवाला पाहातांच चंद्रकेतु व त्याचा वृद्ध सारथी सुमंत्र यांनाहि भारल्या-सारखें झालें. त्याचें शौर्य व त्याची तेजस्विता पाहून ते दोघेहि स्तंभित झाले. चंद्रकेतूनें त्याला स्वत:शीं लढण्या-करितां आव्हान केलें. परंतु तितक्यांत पळ काढणारें चंद्रकेतूचें सैन्य सेनापति आलासें पाहून परत फिरलें व लवावर चालून येऊं लागलें. तेव्हां लवानें नाइलाजानें त्यावर जृंभकास्त्र सोडून सारें सैन्य निश्चेष्ट करून टाकलें.

आकाशांत उठलेल्या लाल पिंगट ज्वाळांच्या भडक्या-वरून लवानें जृंभकास्त्र सोडलें आहे हें चंद्रकेतु व सुमंत्र यांनीं ताडलें. परंतु त्यांना हें कळेना कीं केवळ रामचंद्रा-पाशींच असलेलीं हीं अस्त्रें या बालवीराला कशीं प्राप्त झालीं ! इतक्यांत दोघे वीर एकमेकांजवळ येऊन ठेपले. जवळून पाहिल्यावर एकमेकांच्या मनांत एकमेकांविषयीं सहज प्रेम उत्पन्न झालें; परंतु क्षात्रधर्माप्रमाणें लढाई करण्याशिवाय आतां मार्गच उरलेला नव्हता. तशांत लवानें रामाच्या पराक्रमाविषयीं कांहीं कुत्सित शब्द उच्चारल्या-मुळें चन्द्रकेतूला तें सहन झालें नाहीं; आणि अखेर दोघांचें युद्ध सुरू झालें.

६ ***

लव-चन्द्रकेतूचें युद्ध अगदीं ऐन रंगांत आलें. चन्द्रकेतूनें अग्न्यास्त्र सोडलें, त्यावर लवानें वारुणास्त्राचा प्रयोग केला. अग्न्यास्त्रानें पेटलेला प्रचंड अग्नी वारुणास्त्रामुळें उत्पन्न झालेल्या हजारों जलधारांनीं शांत झाला. लगेच चन्द्रकेतूनें वायव्यास्त्राची योजना केली आणि लवानें उत्पन्न केलेले सारे ढग पळवून लावले. अशा प्रकारें युद्धाची तीव्रता वाढूं लागली.

इतक्यांत आकाशमार्गानें पुष्पक विमानांतून स्वत: रामच तेथें येऊन उतरला. रामानें घाईघाईनें हातानें खूण करून व आपल्या गोड शब्दांनीं त्या दोघां वीरांना युद्ध थांबविण्यास सांगून तो त्यांच्यापाशीं येऊन उभा राहिला. शंबुकाचा वध करून राम जनस्थानांतून अयोध्येला परत जात असतांना वाटेंत त्याला वाल्मीकीच्या आश्रमाजवळ चाललेला हा युद्धप्रसंग दिसला. त्यामुळें कुतूहलानें त्यानें आपलें विमान तेथें उतरविलें होतें.

रामानें युद्ध थांबविण्यास सांगितलें त्याचा परिणाम होऊन लवानें आपलें धनुष्य आवरलें. चन्द्रकेतू तर आपल्या वडिलांसारख्या असलेल्या काकांच्यापुढें जाऊन नम्र झाला. रामानें त्याला आलिंगन देऊन त्याची विचारपूस केली.

तेव्हां चन्द्रकेतूनें म्हटलें कीं, “या विलक्षण पराक्रमी व प्रियदर्शन लवाच्या भेटीनें मी अगदीं खुशाल आहें. म्हणून आपली कृपादृष्टि माझ्याप्रमाणेंच किंबहुना माझ्यापेक्षांहि अधिक या महान वीरश्रेष्ठाकडे वळवावी.”

रामाला चन्द्रकेतूच्या या बोलण्यामुळें लवाविषयीं विशेष कुतूहल वाटल्यानें त्यानें त्याच्याकडे निरखून पाहिलें. लवाचें शांत व आकर्षक रूप पाहून रामाला मोठा आनंद झाला. त्यानें त्याचा “मनुष्याच्या देहानें अवतरलेला अस्त्रवेद” म्हणून गौरव केला. लवानेंहि भक्तीनें व प्रेमानें रामाला प्रणाम केला. रामाचें प्रत्यक्ष दर्शन होतांच रामासंबंधीं त्याच्या मनांत उत्पन्न झालेला विरोधाचा भाव मावळला आणि आनंदानें त्याचें हृदय भरून आलें. अशा थोर पुरुषाविषयीं अनादर प्रकट करून आपण प्रत्यक्ष शस्त्र घेऊन त्याच्याविरुद्ध लढावयास उभें राहिलों, या उद्धटपणाबद्दल लवाला आतां वाईट वाटलें. त्यानें त्याबद्दल रामाची उघडपणें क्षमाहि मागितली. परंतु राम म्हणाला, “यांत तुझा कांहीं अपराध नाहीं. क्षत्रियाला योग्य असेंच तूं वागलास. तेजस्वी पुरुषाला दुसऱ्या तेजस्वी पुरुषाचें तेज सहन होत नाहीं, हें स्वाभाविकच आहे.”

त्यानंतर चन्द्रकेतूकडून रामाला कळलें कीं, लवानें जृंभकास्त्र सोडून आपलें सैन्य निश्चेष्ट करून टाकलें आहे.

तेव्हां रामानें लवाला अस्त्र परत घण्याबद्दल सांगितलें. लवानें अस्त्र काढून घेतल्यावर रामानें त्याला मोठ्या कुतूहलानें विचारलें कीं, "केवळ गुरुपरंपरेप्रमाणें प्राप्त होणारीं हीं अस्त्रें तुला कोणाकडून मिळालीं ?" लवानें उत्तर दिलें कीं, "मला व माझ्या भावाला–कुशाला–तीं आपोआपच प्राप्त झालीं." रामाला त्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें.

तेवढ्यांत कुश भरताश्रमाहून परत आला होता. त्याला कळलें कीं, लवाची कोणाशीं तरी लढाई जुंपली आहे. म्हणून तो त्याच्या मदतीसाठीं लढाईच्या आवेशानेंच तेथें आला. परंतु लवानें त्याला 'रामायणा' चे नायक प्रत्यक्ष रामचन्द्र तेथें आले असल्याचें सांगून शांत केलें. तो म्हणाला "ते आपल्याविषयीं प्रेम बाळगतात व तुला भेटण्याची त्यांना फार उत्कंठा आहे." ह्यामुळें कुशानें पुढें होऊन रामाला मोठ्या आदरानें नमस्कार केला. रामानेंहि त्याला शुभ आशीर्वाद देऊन प्रेमानें जवळ घेतलें. लव व कुश या दोघांना पाहून त्याला सारखें वाटूं लागलें कीं हे आपलेच मुलगे आहेत. आपल्या स्वतःसारखीं इतकेंच नव्हे सीतेसारखींहि अनेक लक्षणें रामाला त्यांच्या ठिकाणीं दिसूं लागलीं. परंतु रामानें तसें स्पष्टपणें बोलून दाखविलें नाहीं. मात्र त्यामुळें त्याला सीतेची आठवण तीव्रतेनें होऊन त्याच्या डोळ्यांतून अश्रु पाझरूं लागले.

लवाला तें पाहून वाईट वाटलें आणि त्यानें रामाची अशी स्थिति होण्याचें कारण काय असें म्हटलें. त्यावर कुशानें सांगितलें, " अरे, रामायण न शिकल्यासारख्या नवख्या माणसाप्रमाणें काय करतोस ! सीतादेवीच्या वियोगापरतें रघुपतीला दुःखाचें आणखी कोणतें कारण असणार ! "

रामाला त्यांच्या त्या संवादाचें मोठें कौतुक वाटलें. त्यानें म्हटलें, " वाल्मीकींनीं आदित्य वंशाची स्तुति असलेलें रामायण नांवाचें एक काव्य लिहिलें आहे असें ऐकतों. त्यांतला कांहीं भाग तुम्हांला येत असला तर म्हणून दाखवा पाहूं. " मुलांना सर्व रामायणच पाठ होतें. त्यांनीं लगेच त्यांतले कांहीं श्लोक म्हणून दाखविले. परंतु त्यांतहि राम-सीतेच्या एकमेकांवरील असीम प्रेमाचेंच वर्णन होतें. त्यामुळें रामाचें अंतःकरण सीतेच्या आठवणींनीं पुन्हां व्याकुळ झालें.

इतक्यांत वसिष्ठ, वाल्मीकि, जनक, राजमाता आणि अरुंधती अशी सर्व वडील मंडळी राम आणि लवकुश बसले होते तिकडेच येत असल्याचें समजलें. वास्तविक त्या म्हाताऱ्या माणसांना आश्रमापासून इतक्या दूर चालत येववत नव्हतें. तरीपण लवाची चन्द्रकेतूशीं लढाई जुंपल्याचें कळल्यामुळें त्यांना काळजी वाटू लागून तीं सर्वजण तिकडे आलीं होतीं. तेथें येतांच रामाची सीताविरहानें झालेली

अवस्था पाहून जनक आणि कौसल्या यांची शुद्धच गेली. रामाला सीतात्यागाच्या आपल्या अपराधामुळें या मंडळीं-समोर व विशेषत: जनकासमोर जावयाला लाज वाटत होती. परंतु जनक मूर्च्छित झाल्याचें पाहून मात्र राम त्याच्या शुश्रूषेसाठीं लगबगीनें तेथून उठला.

७ ***

महर्षि वाल्मीकींनीं स्वत: लिहिलेलें जें एक नाटक भरतमुनींकडे पाठविलें होतें त्याचा प्रयोग रंगभूमीवर व्हावयाचें ठरलें होतें. या प्रयोगांत अप्सरा काम करणार होत्या. त्यासाठीं भागीरथी–गंगेच्या तीरावर प्रशस्त रंग-भूमी तयार करण्यांत आली होती. वाल्मीकींनीं हें नाटक पाहाण्यासाठीं रामाला सर्व परिवारासह बोलावलें होतें. प्रेक्षकांच्या बसण्याची सर्व व्यवस्था लक्ष्मणाकडे दिलेली होती. लक्ष्मणानें रामाचें कुशलवावरील विशेष प्रेम पाहून त्यांच्या बसण्याची व्यवस्था इतर राजपुत्रांप्रमाणेंच ठेवली होती.

राम राजासनावर येऊन बसतांच योग्य वेळीं नाटक सुरू झालें. सूत्रधारानें सुरुवातीला नाटकाचा परिचय करून दिला. पृथ्वीची कन्या सीतादेवी हिचा रामराजानें त्याग केल्यानें तिला अरण्यांत येऊन पडावें लागलें. ती

त्यावेळीं गरोदर होती. त्याच वेळीं तिचे दिवस पूर्ण भरून तिला वेणा येऊं लागल्या. आसपास तर हिंस्र श्वापदें तिच्यावर झडप घालावयास टपून बसलीं होतीं. तेव्हां तिनें भयंकर दु:खानें शेवटीं भागीरथी नदींत स्वत:ला झोकून दिलें.

सूत्रधार बोलत असतांनाच पडद्यांतून सीतेचे शब्द आले, "मी भागीरथींत उडी टाकत्यें." ते शब्द कानावर पडतांच राम ओरडला, "थांब थांब, थोडा वेळ धीर धर!"

हें सर्व नाटक चालू आहे, यांत खरें कांहीं नाहीं याचें भान रामाला राहिलें नव्हतें. परंतु लक्ष्मणानें त्याला सावध करून नाटक चालू असल्याचें सांगितलें. तरीहि रामाला तो दु:खावेग आवरतां आवरेना. परंतु लक्ष्मणाच्या आग्रहा-वरून राम मन घट्ट करून तें नाटक पाहूं लागला.

पुढचा प्रयोग सुरू झाला. पृथ्वी आणि भागीरथी यांनीं आपापल्या मांडीवर एकेक मूल घेतलें होतें आणि बेशुद्ध पडलेल्या सीतेला त्या सांवरीत होत्या. रामाला तें करुण दृश्य पाहावेना. त्याला लक्ष्मणानें हात देऊन सांवरलें. पृथ्वी व भागीरथी यांनीं सीता सावध झाल्यावर तिला दोन मुलगे झाले असल्याचें सांगितलें. आपली दोघींचीहि

ओळख दिली. रघुवंशाला अंकुर उत्पन्न झाल्याचें पाहून लक्ष्मणानें आनंद प्रकट केला.

रामानें केवळ लोकापवादासाठीं सीतेचा त्याग केल्या-मुळें पृथ्वी रामावर फारच रुष्ट झाली होती. ती सीतेची आईच असल्यामुळें तिला असा राग येणें साहजिकहि होतें. परंतु भागीरथी तिची समजूत घालीत होती. रामाच्या वागणुकीचें समर्थन करीत ती म्हणाली, "वस्तुथिति डोळ्याआड करून तूं आपल्या जांवयावर उगीच कां रागावतेस? तो भयंकर लोकापवाद उठलेला, सीतेची अग्निशुद्धी पूर्वीं झाली खरी पण ती अयोध्येपासून फार लांब लंकेंत. मग लोक तिच्यावर विश्वास कसा ठेवणार? इक्ष्वाकुवंशाचें ब्रीद तर प्रजाजनांच्या संतोषाचें. तेव्हां अशा बिकट स्थितींत रामचंद्र तरी दुसरें काय करणार?" शेवटीं तर तिनें रामाच्या वतीनें पदर पसरून सीतेच्या आईची–पृथ्वीची क्षमाहि मागितली.

तो सर्व प्रकार पाहून सीता रडत रडत पृथ्वीला म्हणाली कीं, मला आतां तुझ्या पोटांतच जागा दे. रामालाहि वाटलें कीं, बिचारी यापेक्षा दुसरें काय म्हणणार! परंतु पुन्हा भागीरथी मध्यें पडली व म्हणाली, "सीते! हें असलें अभद्र काय बोलतेस! तुला हजार वर्षांचें आयुष्य

लाभो." पृथ्वीनेंहि सीतेची समजूत घातली कीं, या लहान मुलांच्यासाठीं तरी तुला जगलेंच पाहिजे.

नाटकाच्या त्यापुढील प्रवेशांत कुशलवांना भागीरथीनें वाल्मीकींकडे विद्याभ्यासासाठीं नेऊन ठेवलें आणि त्यांना जृंभकास्त्रें आपोआप प्राप्त झालीं या गोष्टी दाखविल्या होत्या. शेवटच्या प्रयोगांत सीता पृथ्वीला म्हणत होती कीं, इहलोकांत राहून दुर्दैवाचा फेरा सहन करणें आतां माझ्याच्यानें होणार नाहीं, तेव्हां तूं आपली मला आपल्या उदरांत गडप करून टाक. तो प्रवेश संपला आणि भागीरथी, पृथ्वी व सीता रंगभूमीवरून निघून गेलीं तेव्हां रामाला वाटलें कीं, आतां सीता खरोखरीच कायमचीच नाहींशी झाली. तें पाहून "हा देवी!" असा विलाप करीत राम मूर्च्छित होऊन पडला.

इतक्यांत नाटकासाठीं उपयोजिलेलीं सर्व वाद्यें व उपकरणें तेथून काढून घेण्यांत आलीं. नाटक संपलें. समोरील भागीरथीच्या पाण्यांत भयंकर खळबळ सुरू झाली. आकाशांत देव व ऋषी यांनीं येऊन गर्दी केली. आणि भागीरथीच्या प्रवाहांतून पृथ्वी व गंगादेवी यांच्यासह सीता हळूहळू वर येत असलेली दिसूं लागली.

गंगा व पृथ्वी यांनीं अरुंधतीला नमस्कार करून पवित्र, शुद्ध व पुण्यशील सीता तिच्या स्वाधीन केली. अरुंधतीच्या सूचनेवरून सीतेनें स्वतः स्पर्श करून रामाला सावध केलें. अरुंधतीनें तिला हाताशीं धरून पौरजनांना उद्देशून विचारलें– " पृथ्वी,भागीरथी यांनीं हिच्या शीलाची स्तुति केली आहे, पूर्वींहि साक्षात अग्नीनें हिच्या शुद्धतेबद्दल व पावित्र्याद्दल ग्वाही दिलेली आहे. अशा या सूर्यवंशांतील कुलवधूचा स्वीकार करणें आहे. याला तुमची संमति आहे ना ? "

पौरजनांच्या वतीनें लक्ष्मणानें अरुंधतीच्या या बोलण्याला संमति देऊन सीतेला नमस्कार केला. त्यानंतर अरुंधतीनें सीतेला रामाच्या हातीं सुपूर्त करून म्हटलें कीं, ही तुझी सहधर्मचारिणी. आतां यज्ञामध्यें हिचीच योजना कर. अरुंधतीच्या विनंतीवरून वाल्मीकींनीं कुशलवांना आणून रामाच्या हातीं दिलें आणि त्या मुलांना सांगितलें कीं, हा तुमचा पिता, हा लक्ष्मण तुमचा चुलता, हीं देवी सीता तुमची आई, आणि हा जनक तुमचा आजोबा. सर्वांच्या प्रेमानें भेटीगांठी होऊन सर्वत्र आनंदीआनंद झाला. इतक्यांत लवणासुराचा वध करून मथुरेहून शत्रुघ्नहि यशस्वी होऊन परत आला. तें पाहून लक्ष्मण म्हणाला

कीं, “ कल्याणकारक गोष्टी घडायला लागल्या कीं एका-
मागून एक घडूं लागतात, हेंच खरें. ”

● ● ●

## संस्कृत साहित्य सरितेचीं पुस्तकें

७

१. रघुवंश
२. शाकुन्तल
३. विक्रमोर्वशीय
४. मृच्छकटिक
५. प्रतिमा
६. महावीरचरित
७. उत्तररामचरित
८. मालतीमाधव
९. स्वप्नवासवदत्ता
१०. दशकुमारचरित : भाग १
११. दशकुमारचरित : भाग २
१२. वेणीसंहार
१३. कुमारसम्भव
१४. मालविकाग्निमित्र
१५. हर्षचरित
१६. नागानंद
१७. पंचरात्र
१८. रत्नावली
१९. कादम्बरी
२०. मेघदूत
२१. शिशुपालवध
२२. किरातार्जुनीय
२३. बुद्धचरित
२४. मुद्राराक्षस
२५. प्रतिज्ञायौगंधरायण
२६. अविमारक
२७. अभिषेक
२८. मध्यमव्यायोग
२९. कर्णकार
३०. उरुभङ्ग
३१. पार्वतीपरिणय
३२. नलोदय

प्रत्येकीं किंमत ६ आणे

६ आणे

वोरा ॲन्ड कंपनी पब्लिशर्स प्रायव्हेट लि०